सन २०१४-१५ करीता वन बंधू कल्याण योजनेअंतर्गत मंजूर योजनांच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१६/प्र.क्र.५७/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २४/११/२०१६

वाचा-

१. आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.केंद्रीय २०१५ /प्र.क्र.७३/का-१९ दि.१५/१०/२०१५
२. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.१७०१४/०७/२०१४-SG-II, दि.३०/१२/२०१४
३. जनजाती कार्य मंत्रालय,नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.१७०१४/०७/२०१४-SG-II, दि.२६/०२/२०१५
४. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्रमांक केंद्रीय २०१५ /प्र.क्र.७३/का-१९ दि.१४/१२/२०१५
५. आयुक्त आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.नियो-२०१६/वबं/प्र.क्र. २(१५)/का.५(३), दि. २०/०७/२०१६.

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाकडून वनबंधू कल्याण योजना ही केंद्र क्षेत्र योजना (Central Sector Scheme) सन २०१४-१५ या वर्षापासून नव्याने सुरु करण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी पथदर्शी प्रकल्प म्हणुन देशातील एकुण १० तालुक्यांची निवड करण्यात आली होती. यात राज्यातील अक्राणी जि. नंदुरबार या तालुक्याचा समावेश करण्यात आला आहे. या योजनेखाली सन २०१४-१५ या वर्षात केंद्र शासनाने अक्राणी तालुक्याकरीता १८ योजनांसाठी रु. १०.०० कोटी इतका निधी कार्यक्रमनिहाय वितरीत केला आहे. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वाचा क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. त्या अनुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास यांनी यापैकी सादर केलेल्या ११ योजनांच्या मार्गदर्शक सुचनांना मंजूर प्रदान करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

या निर्णयाद्वारे सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार पुढील योजनांच्या/कामांच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | मंजूर निधी (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | Financial Assistance for establishment of poultry farming units | ५८.९८ |
| २. | Establishment of Fruit processing Unit/ Cluster | २१५.१८ |
| ३. | Establishment of E learning/ Small Science centers in Ashram Schools | १०.०० |
| ४. | Financial assistance to 100 APL families (Annual income less than Rs. 1 Lacks) for construction of Pucca Houses | १००.०० |
| ५. | Installation of Solar based / dual hand pumps in padas/ Villages | २५.०० |
| ६. | Construction of Grabbrian structures | १००.०० |

| | | |
|---|---|---|
| ७. | Construction of Village/pada approach roads | १००.०० |
| ८. | Conversion of un electrified remote village/padas in solar village | ५०.०० |
| ९. | ANM/medical services in Ashram Schools and nearby area | २०.०० |
| १०. | Provision of accidental insurance cover to tribal population (BPL & APL) by subscription to Pradhanmantri Suraksha Bima Yojana (PMSBY) | १५.०० |
| ११. | To arrange Training camp for the student to get admission in Krida Prabodhini | १५.०० |
| | एकुण | ७०९.१६ |

सदर मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी. तसेच ज्याप्रकरणी प्रशासकीय मान्यता घेण्यांची आवश्यकता असेल ती प्रकरणे स्वतंत्रपणे शासन मान्यतेसाठी सादर करावीत.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११२४१७३३२२६०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Lalitkumar R Dhaygude

Digitally signed by Dr. Lalitkumar R Dhaygude
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, cn=Dr. Lalitkumar R Dhaygude
Date: 2016.11.24 17:35:18 +05'30'

**( ललितकुमार रं. धायगुडे )**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. स्वीय सहायक, सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४. सार्वजनिक बांधकाम विभाग / नियोजन विभाग / वित्त विभाग/शालेय शिक्षण व क्रिडा विभाग/ सार्वजनिक आरोग्य विभाग/ ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
६. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

## वन बंधू कल्याण योजना-२०१४-१५
## परिशिष्ट क्र.१

<table>
<tr><td>१</td><td>योजनेचे नांव -</td><td>Financial Assistance for establishment of poultry farming units</td></tr>
<tr><td>२</td><td>लाभार्थी/ युनिट संख्या.</td><td>५० युनिट</td></tr>
<tr><td>३</td><td>योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र</td><td>अक्राणी तालुका, जि. नंदूरबार</td></tr>
<tr><td>४</td><td>योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक</td><td>
<table>
<tr><th>Sr. No</th><th>Particulars</th><th>Unit</th><th>Unit Cost</th><th>Sub Total</th></tr>
<tr><td>A</td><td>Fixed Asset</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>1</td><td>Cost of Shed</td><td>1</td><td>88,760</td><td>88,760</td></tr>
<tr><td>2</td><td>Feed & water Pods</td><td>4</td><td>1,300</td><td>5,200</td></tr>
<tr><td></td><td>Total A</td><td></td><td></td><td>93,960</td></tr>
<tr><td>B</td><td>Revenue Exp.</td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>1</td><td>1 Day Old Chiks</td><td>200</td><td>25</td><td>5,000</td></tr>
<tr><td>2</td><td>Feed Bags (50 Kg)</td><td>12</td><td>1,250</td><td>15,000</td></tr>
<tr><td>3</td><td>Vaccination</td><td></td><td></td><td>1,000</td></tr>
<tr><td>4</td><td>Electricity Charges</td><td></td><td></td><td>1,000</td></tr>
<tr><td>5</td><td>Labour & Mic. Exp.</td><td></td><td></td><td>2,000</td></tr>
<tr><td></td><td>Total B</td><td></td><td></td><td>24,000</td></tr>
<tr><td>C</td><td>Engineers Fee & Project Management Cost</td><td>1</td><td>17694</td><td>17694</td></tr>
<tr><td></td><td>Total (A+B+C)</td><td></td><td></td><td>1,35,654</td></tr>
</table>
प्रती शेड १,३५,६५४/- पैकी १,१८,००० (Total A+B) इतका निधी या योजनेतून प्रदान करण्यात यावा. उर्वरीत Engineers Fee & Project Management Cost करीता आवश्यक रक्कम अग्रणी बँकेने प्रती लाभार्थी कर्जाऊ स्वरूपात पाच वर्षाच्या कालावधी करीता उपलब्ध करून द्यावी.</td></tr>
<tr><td>५</td><td>योजना राबविणारी यंत्रणा</td><td>अग्रणी बॅक, नंदूरबार व नाबार्ड यांचे सहाकार्याने Lupin Human Welfare & research Foundation, Nandurbar</td></tr>
<tr><td>६</td><td>अंमलबजावणी अधिकारी</td><td>जिल्हाधिकारी नंदुरबार व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा.</td></tr>
<tr><td>७</td><td>नियंत्रक अधिकारी</td><td>अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक</td></tr>
<tr><td>८</td><td>योजनेचा उद्देश</td><td>१. अल्प भूधारक शेतकऱ्याला उपलब्ध जागेत शाश्वत उपजिविकेचे साधन पुरविणे<br>२. कुपोषणाचे प्रमाण कमी करणे<br>३. खरीप पिकाच्या काढणी नंतर होणारे स्थलांतर थांबविण्यासाठी प्रयत्न करणे<br>४. पारंपारीक शेतीव्यवसायास जोडधंदा सुरु करण्यास चालना देणे</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. लाभार्थ्याची निवड लाभार्थी निवड समितीमार्फत यांचे कडून झाल्यानंतर शेड उभारण्यासाठी लागणाऱ्या बांधकामासाठी सक्षम व्यक्ती/ संस्था यांची निवड करुन त्यांचेकडून बांधकाम करुन घेणे व त्यासाठी आवश्यक साहीत्याची खरेदी करावी.<br>२. संस्थेची निवड करताना प्रचलित निवीदा पद्धतीचा अवलंब करावा.<br>३. साहीत्य खरेदी करताना सुधारीत दर करार पत्रकाप्रमाणेच करण्यात यावा.<br>४. शेड उभारण्यासाठी संस्थेस अदा करण्यात येणारी रक्कम शेड च्या उभारणीच्या टप्प्यानुसार टप्प्या टप्प्याने वितरीत करण्याची खबरदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी घ्यावी. |
| १० | लाभार्थी निवडीची कार्यपद्धती | १.लाभार्थी वन हक्क कायद्यांतर्गत वनपट्टे हस्तांतरीत केलेला लाभार्थी असावा.<br>२.लाभार्थी भारतीय स्टेट बँकेच्या ग्रामिण स्वयंरोजगार प्रशिक्षण केंद्रद्वारे अथवा नाबार्डच्या MEDP कार्यक्रमांतर्गत किंवा शासनाच्या मान्यता प्राप्त अन्य प्रशक्षिण संस्थांद्वारे कुकुटपालनाचे प्रशिक्षण घेतलेला असावा.<br>३.प्रशिक्षीत लाभार्थी प्राप्त होत नसल्यास निवड केलेल्या लाभार्थ्यांना अग्रणी बँकेने प्रशिक्षण देण्याची सोय करावी.<br>४.लाभार्थ्यांकडे स्वत:च्या मालकीची कुक्कुटपालपन करण्याकरीता शेड उभारण्यासाठी जागा असावी<br>५.गरजेनुसार वीज पुरवठ्याची सोय असावी.<br>६.एका गावातुन कमीत कमी २ व जास्तीत जास्त ३ लाभार्थ्यांची निवड करावी. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. वन हक्क कायद्यांतर्गत वन पट्टे प्राप्त धारकांपैकी दारीद्र्य रेषेखालील व विधवा, परीत्यक्ता स्त्री लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे.<br>२. लाभार्थ्याकडे रहीवासी असल्याचा व आवश्यक्तेनुसार दारीद्र्यरेषेखालचा असल्याचा व इतर आनुषंगीक पुरावे असणे आवश्यक आहे.<br>३. लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी पुढील प्रमाणे समिती गठित करण्यात यावी.<br>I. जिल्हाधिकारी, नंदुरबार- अध्यक्ष<br>II. प्रतिनिधी अग्रणी बँक नंदुरबार- सदस्य<br>III. जिल्हा व्यवस्थापक, नाबार्ड, नंदुरबार- सदस्य<br>IV. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा- सदस्य सचिव<br>४. लाभार्थ्यांच्या जागेवर शेड उभारुन दिल्यानंतर लाभार्थ्यांस दुसऱ्यास विकता येणार नाही. याबाबतचा रु.१००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करुन घेण्यांत यावा. |

| | | |
|---|---|---|
| | | ५. सदर योजनेच्या प्रगती संबंधी मासिक प्रगती अहवाल लक्षांक तसेच साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>६. योजने अंतर्गत लाभार्थ्यास लाभ दिल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>७. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>८. सदर योजनेसाठी मंजुर लक्षांकाप्रमाणे पात्र लाभार्थी न मिळाल्यास लक्षांक वर्ग/बदल करण्याचे अधिकार, शासनास राहील.<br>९. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>१०. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| १२ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. सदर योजनेमुळे लाभार्थ्याच्या उत्पन्नात झालेल्या वाढीचा संपुर्ण तपशिल अंमलबजावणी अधिकारी ठेवेल.<br>२. प्रकल्पाच्या सुरवातीच्या प्रक्रियांपासून म्हणजेच लाभार्थी निवड, प्रशिक्षण, अंदाजपत्रक निहाय खरेदी, बांधकामाचे नियोजन इत्यादी कामे पुर्ण होवून प्रकल्प कार्यन्वित होवून त्यामधून मिळालेले अंडी/ मांस यांच्या विक्री व्यवस्थेची जोडणी करून देण्याची जबाबदारी वरील प्रमाणे लाभार्थी निवडी करीता नेमणूक केलेल्या समितीची राहील. |

## परिशिष्ट क्र. २

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Establishment of Fruit processing Unit/ Cluster |
| २ | लाभार्थी/ युनिट संख्या. | १५ ग्राम संघ/ २१८ गट/ ५०० युनिट<br>१५ ग्राम संघांची सविस्तर यादी सोबत जोडली आहे. |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | अक्राणी तालुका, जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | एकुण प्रकल्प खर्च रु. २१५.१८ लक्ष<br>सविस्तर अंदाजपत्रक सोबत जोडले आहे. |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प संचालक (आत्मा) नंदुरबार /जिल्हा अधिक्षक कृषी व जिल्हा अभियान कक्ष, उमेद नंदूरबार |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | जिल्हाधिकारी नंदुरबार व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा. |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | १. खरीप पिकाच्या काढणी नंतर होणारे स्थलांतर थांबविण्यासाठी प्रयत्न करणे<br>२. पारंपारीक शेतीव्यवसायास जोडधंदा सुरु करण्यास चालना देणे<br>३. गावांतील महीलांच्या स्वयंसाहाय्यता गटांना स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करून देणे<br>४. लाभार्थ्यांचे आर्थिक जिवनमान उंचावणे<br>५. गरीब आदिवासी कुटुंबासाठी शाश्वत उपजिवीकेचे साधन निर्माण करणे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. सोबत जोडलेल्या गावांच्या यादीतील ग्रामसंघांची निवड प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी प्रकल्प संचालक (कृषी) आत्मा/जिल्हा अधिक्षक कृषी व उमेद यांचे सहाकार्याने निवड करावी.<br>२. अशाप्रकारे निवड केलेल्या स्वयंसहाय्यता गटांना प्रशिक्षण देवून प्रकल्प कार्यन्वित करण्याच्या अनुषंगाने आवश्यक साधन सामुग्री पुरविणे आत्मा व उमेद यांनी करणे आवश्यक आहे.<br>३. योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने खरेदी करण्याची आवश्यक्ता असल्यास शासनाने वेळोवेळी दिलेल्या प्रचलित मार्गदर्शक सुचनांचा व पद्धतींचा वापर करावा.<br>४. प्रकल्प कार्यन्वित करून त्याद्वारे उत्पन्न मिळवून देण्याच्या दृष्टीने आवश्यक कार्यवाही करण्याची जबाबदारी आत्मा व उमेद यांची राहील. |
| १० | लाभार्थी निवडीची कार्यपद्धती | १. दारीद्र्य रेषेखालील महीलांच्या बचतगटांना प्राधान्य देण्यात यावे.<br>२. प्रती गावातून कमीत कमी २ व जास्तीत जास्त ३ गटांची निवड करावी. |

| | | |
|---|---|---|
| | | ३. विधवा, परीत्यक्ता स्त्रीया, अंपग यांना प्राधान्य द्यावे.<br>४. गटांची निवड प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी करावी. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. लाभार्थ्याकडे रहीवासी असल्याचा व आवश्यक्तेनुसार दारीद्र्यरेषेखालचा असल्याचा व इतर आनुषंगीक पुरावे असणे आवश्यक आहे.<br>२. प्रकल्प कार्यन्वित झाल्यानंतर लार्भार्थी गटास सदर प्रकल्प दुसऱ्यास विकता येणार नाही. याबाबतचा रु.१००/- च्या स्टॅम्प पेपरवर करारनामा करुन घेण्यांत यावा.<br>३. सदर योजनेच्या प्रगती संबंधी मासिक प्रगती अहवाल लक्षांक तसेच साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>४. योजने अंतर्गत लाभार्थ्यास लाभ दिल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>५. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>६. सदर योजनेसाठी मंजुर लक्षांकाप्रमाणे पात्र लाभार्थी न मिळाल्यास लक्षांक वर्ग/बदल करण्याचे अधिकार, शासनास राहील.<br>७. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>८. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| १२ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |

| | | |
|---|---|---|
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. योजनेचे तिमाही मुल्यमापन व संनियंत्रण करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील<br>२. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा प्रकल्प कार्यन्वित असताना वेळोवेळी आदिवासी निरीक्षकांमार्फत योजनेच्या प्रगतीचा आढावा घ्यावा. |

## परिशिष्ट क्र. ३

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Establishment of E learning/ Small Science centers in Ashram Schools |
| २ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, तलई, ता.धडगाव |
| ३ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | १ डिजीटल क्लासरुम- रु. २.०० लक्ष<br>२ स्मॉल सायन्स सेंटर- रु. ८.०० लक्ष |
| ४ | योजना राबविणारी यंत्रणा | शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, तलई, ता.धडगाव व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा |
| ५ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा |
| ६ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ७ | योजनेचा उद्देश | १. मा. राज्यपाल यांनी आदिवासी विद्यार्थ्यांना जागतीक स्पर्धमध्ये टिकुन राहण्यासाठी त्यांना विज्ञान व संगणक क्षेत्राचे विशेष ज्ञान देवून या स्पर्धेच्या युगात सक्षम बनविण्याकडे विशेष लक्ष देण्याबाबत निर्देश दिले आहेत.<br>२. केंद्र शासनाने माध्यमिक शाळांमधील विद्यार्थ्यांना विज्ञानाचे विशेष ज्ञान देण्याकरीता निधी उपलब्ध करून देण्याबाबत वेळोवेळी अवगत केले आहे.<br>३. उपरोक्त निर्देशास अनुसरून या प्रकल्पाद्वारे शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, तलई, ता.धडगाव येथील विद्यार्थ्यांना संगणकाचे प्रात्यक्षिक ज्ञान व हाताळण्याची संधी मिळण्यासाठी डिजीटल क्लासरुम उभारण्यात येणार आहे.<br>४. सध्याच्या विज्ञान युगात विज्ञानाचे प्रत्यक्ष व प्रायोगिक स्वरूपात ज्ञान प्राप्त करण्यासाठी स्मॉलसायन्स सेंटर ची उभारणी करण्यात येणार आहे. |
| ८ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, तलई, ता.धडगाव या आश्रमशाळेत डिजीटल क्लासरुम व स्मॉलसायन्स सेंटर करीता दोन स्वतंत्र खोल्या उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबधित शाळेच्या मुख्याध्यापकांची राहील.<br>२. सदर प्रकल्प उभारण्यासाठी आवश्यक साहीत्य व साधानाची खरेदी प्रचलित नियमांनुसार करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील.<br>३. शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, तलई, ता.धडगाव येथील शिक्षकांना संगणक व विज्ञान क्षेत्रामधील विशेष ज्ञान प्राप्त करण्यासाठी शासकीय आश्रमशाळा, कोठाली, नंदूरबार येथील तज्ञ शिक्षकांमार्फत प्रशिक्षण देण्यात येईल. |

| | | |
|---|---|---|
| | | ४. सदर प्रकल्पांतर्गत मिळालेल्या साहीत्याची देखभाल करण्याची जबाबदारी मुख्याध्यापक शासकीय माध्यमिक आश्रमशाळा, तलई, ता.धडगाव यांची राहील. |
| ९ | योजनेच्या अटी व शर्ती | १. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>२. योजने अंतर्गत प्रकल्प उभारल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>३. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>४. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>५. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| १० | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| ११ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. सदर योजनेमुळे विद्यार्थ्यांच्या शिक्षणात / अभ्यासात झालेल्या प्रगतीचा तिमाही अहवाल संबधित शाळेचे मुख्याध्यापक संनियंत्रण व मुल्यमापन यांना सादर करतील<br>२. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा /सहा. प्रकल्प अधिकारी (शिक्षण) यांचेमार्फत योजनेचे संनियंत्रण व मुल्यमापन केले जाईल. |

## परिशिष्ट क्र. ४

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | **Financial assistance to 100 APL families (Annual income less than Rs. 1 Lacks) for construction of Pucca Houses** |
| २ | लाभार्थी/ युनिट संख्या. | **100 APL families (Annual income less than Rs. 1 Lacks)** |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | अक्राणी तालुका, जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | **१०० लाभार्थ्यां करीता प्रती लाभार्थी रु. १.०० लक्ष प्रमाणे १०० घरकुले (शबरी आदिवासी घरकुल योजनेच्या धर्तीवर)** |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, नंदूरबार (DRDA) |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, नंदूरबार (DRDA) |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका, जि. नंदूरबार येथील बहुतांशी जमाती स्थलांतर करणाऱ्या असुन त्यांना स्वतःची घरेही नाहीत तर काहींची कुडा-मातीची आहेत अशा आदिवासी कुटुंबांना पक्के घरकुल बांधून देवून त्यांना शौचालय व स्नानगृहाची व विद्युत सुविधा उपलब्ध करुन कायम व शाश्वत स्वरुपाचा निवारा उपलब्ध करुन देणे, स्थलांतरास आळा घालून त्यांचे राहणीमानात सुधारणा घडवुन आणणे, कायम व शाश्वत स्वरुपाचा निवारा उपलब्ध करुन देणे व स्थलांतरास आळा घालणे हा या योजनेचा उददेश आहे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. योजनेची अंमलबजावणी आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय क्र. केंद्रीय-२००५/प्र.क्र.९५/का-१७, दि. ३०/७/२००८ व शासन निर्णय क्र. घरकुल-२००९/ प्र.क्र. २३०/का-१७, दि. १५/०२/२०१० प्रमाणे करण्यात येईल.<br>२. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी लाभार्थ्यांची यादी सुपुर्द केल्यानंतर जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा योजनेची अंमलबजावणी करतील. |

| | | |
|---|---|---|
| १० | लाभार्थी निवडीची कार्यपद्धती | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणेकडे पात्र लाभार्थ्यांची निवड करुन यादी सुपुर्त करतील. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. घरकुल योजनेसंबंधीच्या आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय दिनांक ३० जुलै २००८ व दिनांक १५ फेब्रुवारी २०१० मध्ये विहीत केलेल्या अटीशर्तीच्या अधिन राहून लाभार्थी व अंमलबजावणी यंत्रणेची निवड करण्यात यावी. तसेच त्यात नमूद टाईप प्लॅन प्रमाणेच घरकुल बांधावे.<br>२. लाभार्थ्यांस स्वत:चे पक्के घर नसावे तसेच शासनाच्या कोणत्याही विभागामार्फत अथवा जिल्हा परिषदेमार्फत घरकूल योजनेचा लाभ घेतलेला नसावा.<br>३. आवश्यकतेनुसार लाभार्थ्यांशी / संस्थेशी करारनामा करण्यात यावा.<br>४. अपर आयुक्त हे या योजनेचा विशेष आढावा दरमहा घेतील व त्यांचे विभागाचा संकलीत अहवाल आयुक्तालयास सादर करतील.<br>५. उक्त योजनेची अंमलबजावणी करतांना व योजना पूर्ण झाल्यांनंतर चांगल्या प्रतीची चित्रफीत व छायाचित्रे लाभार्थ्यांचे मनोगत यासह फलनिष्पत्ती अहवाल प्रकल्प अधिकारी यांनी त्यांचे स्तरावर जतन करावा तसेच योजनेची यशोगाथा वरिष्ठ कार्यालयास सादर करावी.<br>६. या योजनेअंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांचे नाव, पत्ता, संपर्काचा क्रंमाक (असल्यास ) जमात, लाभ दिल्याचे वर्ष, लाभाचे स्वरुप, लाभाची किंमत, लाभार्थ्यांचे अर्ज, छायाचित्र इ. माहीती प्रकल्प अधिकारी यांचे स्तरावर जतन करण्यात यावी.<br>७. प्रत्येक घरकूलावर आदिवासी विकास विभागाकडील सन २०१४-१५ करीता वन बंधू कल्याण योजनेअंतर्गत लाभ मिळाला आहे अशा आशयाचे तपशिलवार नामनिर्देशक फलक तयार करुन दर्शनी भागात लावणेत येईल.<br>८. सदर योजनेसाठी मंजूर लक्षांकाप्रमाणे पात्र लाभार्थी न मिळाल्यास लक्षांक वर्ग / बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील. |

| | | |
|---|---|---|
| | | ९. योजनेच्या अंमलबजावणी मध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार आयुक्त, आदिवासी विकास यांना राहील.<br>१०. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या याद्या अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सूचनाफलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी यांची राहील. |
| १२ | योजनेचा कालावधी | एक वर्ष |
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील व या मुल्यमापनावरच अंमलबजावणी यंत्रणेस निधीचा पुढील हफ्ता वितरीत करतील. |

## परिशिष्ट क्र. ५

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Installation of Solar based / dual hand pumps in padas/ Villages |
| २ | लाभार्थी.युनिट संख्या / | ०५ युनिट, प्रती युनिट १००-१५० लाभार्थी |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | अक्राणी तालुका, जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणाया खर्चाचे - सविस्तर अंदाजपत्रक | प्रती युनिट रु. ५.०० लक्ष प्रमाणे पाच युनिट करीता रु.२५.०० लक्ष |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | ग्रामिण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परीषद नंदुरबार |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | उप अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परीषद, नंदूरबार, मुख्य अधिकारी, जिल्हा परीषद, नंदूरबार व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका हा सातपुडा पर्वत रांगामध्ये अतीशय दुर्गम अशा भागामध्ये आहे. या भागातील डोंगर कपाऱ्यामध्ये विखुरलेल्या स्वरुपात असणाऱ्या लहान लहान आदिवासी पाड्यांमध्ये बऱ्याच ठिकाणी पाणीपुरवठा योजनेचा अभाव आहे. तसेच विजेच्या बाबत असलेल्या समस्येमुळे याठिकाणी गावांमध्ये/ पाड्यामध्ये विजेवर व सौर उर्जेवर चालणारे पंप उपलब्ध करुन दिल्यास येथील स्त्रीयांची पाण्यासाठी होणारी भटकंती थांबू शकेल. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास, तळोदा हे जिल्हा परीषदेच्या संबधित अधिकाऱ्यांसोबत चर्चाकरून गावांची / पाडयाची निवड करतील<br>२. संबधित गावाच्या ग्रामसभेमध्ये सदर योजना राबविण्याबाबत नेमक्या ठिकाणाची निवड करण्यात येईल. |
| १० | योजनेच्या अटी व शर्ती | १. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>२. योजने अंतर्गत प्रकल्प उभारल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>३. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा. |

| | | |
|---|---|---|
| | | ४. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>५. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| ११ | योजनेचा कालावधी | एक वर्ष |
| १२ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील<br>२. या मुल्यमापनावरच अंमलबजावणी यंत्रणेस निधीचा पुढील हफ्ता वितरीत करतील.<br>३. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

## परिशिष्ट क्र. ६

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Construction of Grabbrian structures |
| २ | लाभार्थी/ युनिट संख्या. | ४ बंधारे |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | अक्राणी तालुका, जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | रु. २५.०० लक्ष /प्रती बंधारा<br>एकुण ४ बंधारे |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | लघु सिंचन विभाग, जिल्हा परीषद, नंदूरबार |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व कार्यकारी अभियंता, लघूसिंचन विभाग, |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका हा सातपुडा पर्वत रांगामध्ये अतीशय दुर्गम अशा भागामध्ये आहे. या भागातील डोंगर कपाऱ्यामध्ये विखुरलेल्या स्वरुपात आहे. याठिकाणी डोंगराळा भाग असल्यामुळे पावसाचे प्रमाण चांगले आहे तथापि पावसाद्वारे पडणारे पाणी आडवण्यासाठी व त्याचा बारमाही सिंचनासाठी वापर करण्याकरीता आवश्यक यंत्रणा नसल्याने या भागातील शेतीसाठी सिंचनासाठी पाण्याची उपलब्धता नसल्याने या भागातील बरेच लोक शेती न करता आल्याने नोकरीसाठी स्थलांतर करीता आहेत. अशा शेतकऱ्यांचे स्थलांतर थांबविण्यासाठी व सिंचित क्षेत्र वाढविण्यासाठी या योजनेची अंमलबजावणी करण्यात येणार आहे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा लघु सिंचन विभाग, जिल्हा परीषद, नंदूरबार यांचे सहकार्याने बंधाऱ्याच्या ठिकाणांची निवड करतील.<br>२. योजनेची अंमलबजावणी शासनाच्या प्रचलित निवीदा प्रक्रीया राबवून योजनची अंमलबजावणी करावी.<br>३. निवड केलेल्या ठिकाणी बंधाऱ्यांची अंदाजपत्रके अंमलबजावणी यंत्रणेकडून तयार करून त्यांना शासनाची प्रशासकीय मान्यता घेणे आवश्यक आहे. |
| १० | योजनेच्या अटी व शर्ती | १. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे. |

| | | |
|---|---|---|
| | | २. योजने अंतर्गत प्रकल्प उभारल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>३. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>४. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>५. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| ११ | योजनेचा कालावधी | एक वर्ष |
| १२ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील<br>२. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

## परिशिष्ट क्र.७

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Construction of Village/pada approach roads |
| २ | रस्त्याचे नाव | MSH-१ ते रोडांलचपाडा मोथासेलबारपाडा VR-२३ किमी १/२०० ते ४/०० ता. अक्राणी, जि. नंदूरबार |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | ता. अक्राणी, जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | एकुण आवश्यक निधी रू. १००.०० लक्ष<br>रस्त्यांचे बांधकाम- २५.०० लक्ष<br>स्लॅब ड्रेनचे बांधकाम-२ नं<br>धापा ड्रेनचे बांधकाम-६ नं |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा. |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, शहादा. |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका हा सातपुडा पर्वत रांगामध्ये अतीशय दुर्गम अशा भागामध्ये आहे. या भागातील डोंगर कपाऱ्यामध्ये विखुरलेल्या स्वरुपात आहे. या भागातील बऱ्याच आदिवासी पाडे / खेडे अजूनही मुख्य रस्त्याशी जोडलेले नाहीत. अशा पाडे / खेड्यांना मुख्य रस्त्याशी जोडण्याकरीता रस्ते बांधकाम करण्यात येणार आहे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. उपरोक्त प्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभागाकडून प्राप्त रस्त्याच्या बांधकामाची सविस्तर अंदाजपत्रके (नकाशा व छायाचित्रांसहीत) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी तयार करून घ्यावीत.<br>२. सदर अंदाजपत्रकांना शासनाची प्रशासकीय मान्यता घेतल्यानंतर या अनुषंगाने शासनाने निश्चित केल्याप्रमाणे विहीत निविदा प्रक्रीया पार पाडून कामाची सुरवात करण्यात यावी.<br>३. कामाची प्रगती पाहुन टप्प्या टप्प्याने अंमलबजावणी यंत्रणेने निधीचे वितरण करावे. |
| १० | योजनेच्या अटी व शर्ती | १. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे. |

| | | |
|---|---|---|
| | | २. योजने अंतर्गत प्रकल्प उभारल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>३. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>४. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>५. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| ११ | योजनेचा कालावधी | एक वर्ष |
| १२ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील<br>२. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

## परिशिष्ट क्र.८

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Conversion of un electrified remote village/padas in solar village |
| २ | लाभार्थी/ युनिट संख्या. | २४९ नग होमलाईट, सौर पथदिवे ४९ नग |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | ता. अक्राणी, जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | <table><tr><th>अ.क्र.</th><th>पुरविण्यात येणाऱ्या सोयी</th><th>रु.</th></tr><tr><td>१</td><td>सौर होमलाईट सिस्टम (Model ४)<br>एकुण २४९ नग प्रति नग १६६००/-<br>१६६०० X २४९= ४१,३३,४००</td><td>४१,३३,४००/-</td></tr><tr><td>२</td><td>सौर पथदिवे (Led based)<br>एकुण नग ४९, प्रति नग रु. १७६४१/-<br>१७६४१ X ४९ = ८,६४,४०९/-</td><td>८,६४,४०९/-</td></tr><tr><td></td><td></td><td>४९,९७,८०९/-</td></tr></table> |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (मेडा), पुणे यांचे सहाकार्याने |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका हा सातपुडा पर्वत रांगामध्ये अतीशय दुर्गम अशा भागामध्ये आहे. या भागातील डोंगर कपाऱ्यामध्ये विखुरलेल्या स्वरुपात आहे. आजही ज्या गावांना पाड्यांवर विजेची व्यवस्था नाही अशा ठिकाणी सौर होमलाईट सिस्टीम प्रतिघरकूल व सौर पथदिवे गावासाठी दिल्यास गावकऱ्यांना उजेडाची सोय उपलब्ध होवू शकेल. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १. ग्रामसभेच्या मान्यतेने प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी लाभार्थ्यांची यादी तयार करावी.<br>२. योजनेची अंमलबजावणी मेडा स्वत: करण्यास तयार असल्यास निधी मेडा कडे हस्तांतर करून उपरोक्त अंदाजप्रमाणे योजनेची अंमलबजावणी करावी.<br>३. मेडा कडून अंमलबजावणी शक्य नसल्यास या क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या संस्थांमार्फत या योजनेची अंमलबजावणी विहीत कार्यपद्धतीचा अवलंब करून उपरोक्त अंदाजपत्रकांप्रमाणेच करण्यात यावा.<br>४. योजनेची अंमलबजावणी संस्थेमार्फत करण्यापुर्वी त्यांच्याशी आवश्यक करारनामा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी करावा. |

| | | |
|---|---|---|
| १० | लाभार्थी निवडीची कार्यपद्धती | १. ज्या गावांना पाड्यांवर विजेची व्यवस्था नाही अशा गावांचा सर्व्हे करून या गावातील ग्रामसंभांमध्ये या योजनेच्या अंमलबजावणी करीता लाभार्थ्यांची नावे निश्चित करावी.<br>२. लाभार्थी निवड करताना लाभार्थ्यांस विजपुरव्याच्या दुसऱ्या योजनेचा यापुर्वी लाभ मिळाला नसल्याची खात्री प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी करावी. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. लाभार्थी हा दारिद्र्य रेषेखालील असावा.<br>२. लाभार्थ्यांकडे आदिवासी असल्याबाबत आवश्यक जात प्रमाणपत्रे असावीत.<br>३. अपंग, विधवा, परीत्यक्ता, वृद्ध लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे.<br>४. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>५. योजने अंतर्गत प्रकल्प उभारल्यानंतर आदिवासी विकास विभागाकडील वन बंधू कल्याण योजना सन २०१४-१५ अंतर्गत, या योजनेचा लाभ देण्यात आला आहे अशा आशयाचा तपशिलवार नामनिर्देश फलक तयार करून दर्शनिय भागात लावण्यांत यावा.<br>६. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>७. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>८. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| १२ | योजनेचा कालावधी | १ वर्षे |
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील |

| | | |
|---|---|---|
| | | २. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

## परिशिष्ट क्र.९

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | ANM/medical services in Ashram Schools and nearby area |
| २ | युनिट संख्या. | १७ शासकीय आश्रमशाळा व परीसर |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | ता. अक्राणी जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | एकुण आवश्यक निधी- २० लक्ष<br>१७ शासकीय आश्रमशाळांकरीता प्रती तपासणी भेटी करीता व सहा महीन्यांकरीताच्या औषधोपचाराकरीता रू. ०.२५ लक्ष निधी प्रती भेट याप्रमाणे निधी वितरीत करावा.<br>याप्रमाणे २ वर्षांकरीता ४ भेटींकरीता एकुण रु. १७.०० लक्ष निधी<br>आरोग्य सेविकांमार्फत देण्यात येणाऱ्या भेटींकरीता, आश्रमशाळांमध्ये विद्यार्थ्यांमध्ये आकस्मित उद्भवणाऱ्या आरोग्य समस्यांकरीता व प्रथमोपचार सुविधेसाठी सुसज्ज प्रथमोपचार पेटी पुरविण्यासाठी एकुण रु. ३.०० लक्ष निधी |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा, आरोग्य विभाग, जिल्हा परीषद, महीला व बाल कल्याण विभाग, जिल्हा परीषद, नंदूरबार |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा, मुख्य अधिकारी, जिल्हापरीषद, महीला व बाल कल्याण अधिकारी. |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका हा सातपुडा पर्वत रांगामध्ये अतीशय दुर्गम अशा भागामध्ये आहे. या भागातील डोंगर कपाऱ्यामध्ये विखुरलेल्या स्वरुपात आहे. या भागामध्ये आरोग्याच्या सुविधा अद्यापही पोहचत नसल्यामूळे याभागातील आदिवासी जनतेला बऱ्याच आरोग्याच्या समस्येला तोंड द्यावे लागते. आवश्यक वेळेत उपचार न मिळणे, योग्य कालावधीमध्ये रोगांचे निदान न होणे यामूळे आश्रमशाळांमधील बऱ्याच विद्यार्थ्यांमध्ये आरोग्याच्या समस्या आढळून येतात. या समस्या दुर करण्यासाठी या तालुक्यातील १७ आश्रमशाळातील विद्यार्थ्यांची वर्षातून दोन वेळा संपुर्ण आरोग्य तपासणी व आकस्मित गरजेच्या वेळी सुविधा उपलब्ध होण्यासाठी या योजनेचा लाभ होणार आहे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | वर्षातून दोन वेळा आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांची वैद्यकीय पथकामार्फत सखोल आरोग्य तपासणी केली जाईल व आरोग्य सेविकां (ANM) मार्फत महिन्यातून दोन वेळा आश्रमशाळांना भेटी देवून किरकोळ औषधोपचार करतील. व सदर भेटीमध्ये त्यांचे मार्फत विद्यार्थ्यांना आरोग्य शिक्षणाबाबत माहीती व उपदेश देखील केले जातील. |

| | | |
|---|---|---|
| १० | योजनेच्या अटी व शर्ती | १. वैद्यकीय पथकाने वर्षातून किमान दोन वेळा आश्रमशाळांना भेट देवून तपासणी करावी.<br>२. दोन भेटी दरम्यान अंदाजे ६ महीन्यांचे अंतर असावे.<br>३. आरोग्य सेविकांनी महीन्यातील दुसऱ्या व चौथ्या आठवड्यातील वार निश्चित करून त्याच दिवशी प्रत्येक महिन्याला आश्रमशाळेमध्ये भेट द्यावी.<br>४. प्रत्येक विद्यार्थ्यांचे स्वतंत्र आरोग्य तपासणीच्या नोंदी व कागदपत्रे ठेवण्याची जबाबदारी मुख्याध्यापकांची राहील.<br>५. त्या कागदपत्रांमध्ये आरोग्य सेविका व वैद्यकीय पथकाने प्रत्येक विद्यार्थ्यांच्या बाबत केलेल्या तपासणीच्या व निष्कर्षाच्या नोंदी घ्याव्यात.<br>६. विद्यार्थ्यांच्या वजन, उंची, छातीचा घेर यासारख्या नोंदीतून त्याच्या वाढीवर होणारे सकारात्म व नकारात्म परीणामांची नोंद घ्यावी.<br>७. विद्यार्थ्यांमध्ये उद्भवणाऱ्या विशेष आजारांबाबत त्यांना विशेष चिकित्सेची आवश्यक्ता असल्यास त्याबाबतची माहीती मुख्याध्यापकांना देवून त्यांना ती चिकीत्सा मिळण्यासाठी आवश्यक उपाययोजना कराव्यात.<br>८. योजनेच्या अंमलबजाणी करीता पुढील वैद्यकीय पथकाच्या भेटीकरीता आवश्यक निधी मागील भेटी दरम्यान केलेल्या तपासणीचा आढावा घेवूनच वितरीत करावा. |
| ११ | योजनेचा कालावधी | २ वर्ष |
| १२ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील<br>२. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

## परिशिष्ट क्र.१०

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | Provision of accidental insurance cover to tribal population (BPL & APL) by subscription to Pradhanmantri Suraksha Bima Yojana (PMSBY) |
| २ | युनिट संख्या. | १,२५,००० लाभार्थी |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | ता. अक्राणी जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | ता. अक्राणी जि. नंदूरबार येथील १,२५,००० लाभार्थ्यांना एकुण रु. १५.०० लक्ष निधीतून Pradhanmantri Suraksha Bima Yojana (PMSBY) या योजनेअंतर्गत विमा सुरक्षा प्रदान करण्यात येणार आहे. |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व New India Assurance Co.Ltd. |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक |
| ८ | योजनेचा उद्देश | अक्राणी तालुका हा सातपुडा पर्वत रांगामध्ये अतीशय दुर्गम अशा भागामध्ये आहे. या भागातील डोंगर कपाऱ्यामध्ये विखुरलेल्या स्वरुपात आहे. या भागातील आदिवासींची आर्थिक व सामाजिक स्थिती दुर्बल असल्याने यांच्या मध्ये बचतीची व गुंतवणूकीची प्रवृत्ती देखील फार कमी आहे. तसेच या दुर्गम भागामध्ये आदिवासींमार्फत करण्यात येणाऱ्या सहासी कामांमुळे या भागामध्ये अपघाती, विषारी प्राण्याने चावा घेतल्याने होणारे मृत्यु चे प्रमाण जास्त आहे. या भागातील लोकांमध्ये विमा काढण्याबद्दल व शासकीय विमा योजनांबाबत असणाऱ्या अनास्थेमुळे त्यांच्या कुटुंबीयांना या योजनांचा लाभ मिळू शकत नाही. सबब, या योजनेद्वारे New India Assurance Co. Ltd. च्या सहकार्याने या भागातील आदिवासी लाभार्थ्यांना प्रधान मंत्री सुरक्षा विमा योजनेचा लाभ देण्यात येणार आहे. |
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | १.New India Assurance Co. Ltd. च्या सहकार्याने प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांनी ग्रामसभेच्या मान्यतेने पात्र लाभार्थ्यांची निवड करावी.<br>२.अशा प्रकारे पात्र लाभार्थ्यांची यादी New India Assurance Co. Ltd यांना उपलब्ध करून देण्यात यावी.<br>३.पात्र लाभार्थ्यांना New India Assurance Co. Ltd या योजनेअंतर्गत लाभ मिळवून देण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

| | | |
|---|---|---|
| १० | लाभार्थी निवडीची कार्यपद्धती | लाभार्थ्यांची निवड ग्रामसभेच्या मान्यतेने करण्यात यावी. ग्रामसभेकडून निवड झालेल्या लाभार्थ्यांच्या कागदपत्रांची तपासणी करून निवड झालेल्या अंतीम लाभार्थ्यांची यादी शासनाच्या व New India Assurance Co. Ltd च्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करावी. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. लाभार्थी हा दारिद्र्य रेषेखालील असावा.<br>२. लाभार्थ्यांकडे आदिवासी असल्याबाबत आवश्यक जात प्रमाणपत्रे असावीत.<br>३. अपंग, विधवा, परीत्यक्ता, वृद्ध लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे.<br>४. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>५. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>६. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>७. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| १२ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील<br>२. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |

## परिशिष्ट क्र.११

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नांव - | To arrange Training camp for the student to get admission in Krida Prabodhini |
| २ | युनिट संख्या. | १०० मुले/ मुली |
| ३ | योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र | ता. अक्राणी जि. नंदूरबार |
| ४ | योजनेसाठी येणा-या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक | एकुण रु. १५.०० लक्ष |

| क्र. | खर्चाचे विवरण | नग | एकुण |
|---|---|---|---|
| १ | तालुक्यातील १०० आदिवासी खेळाडूंची विविध खेळासाठी तज्ञ मार्गदर्शकांमार्फत चाचणी घेवून निवड करणे | १० तज्ञ मार्गदर्शक, ०८ दिवस | |
| | तज्ञ मार्गदर्शकाकरीता तपासणी केंद्रावर जाण्याकरीता वाहन भाडे | २५००X०८ दिवस | २०,०००/- |
| | तज्ञ मार्गदर्शकांचे मानधन | ५००X१०X०८ दिवस | ४०,०००/- |
| | तपासणी साठी लागणारे आवश्यक साहित्य | २०,०००/- | २०,०००/- |
| | तज्ञ मार्गदर्शकांसाठी निवास व भोजन व्यवस्था | ३०००X०८ दिवस | २४,०००/- |
| २ | खेळाडूंचे प्रवास खर्च (अक्राणी पासून जिल्हा संकुल नंदुरबार पर्यंत येण्या-जाण्याचा) सरासरी | खेळाडू १०० | ३०,०००/- |
| ३ | खेळाडूंचे निवास व भोजन खर्च- | १००X३००X२० दिवस | ६,००,०००/- |
| ४ | खेळाडूंना क्रीडा साहित्य | १००X५०० | ५०,०००/- |
| ५ | खेळाडूंना गणवेश स्पोर्ट शुज, टीशर्ट, नेपकीन, कॅप, किटबॅग, बॉटल, ट्रॅकसुट | १००X२५००/- | २,५०,०००/- |
| ६ | बालेवाडी स्पोर्ट कॉम्पलेक्स, क्रिडा सहल | १००X०१X१५००/- | १,५०,०००/- |
| ७ | जिल्हा क्रीडा संकुल मैदान भाडे | २०००X२० दिवस | ४०,०००/- |
| ८ | ग्रांऊंडमनचे मानधन | ५X३००X२० दिवस | ३०,०००/- |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ९ | उद्घघाटन / समारोप (फोटो व्हिडिओ शुटींग फ्लेक्स मंडप , साऊंड सिस्टीम) | -- | ३०,०००/- |
| | | १० | प्रकल्प अहवाल व प्रसिध्दी खर्च | -- | १६,०००/- |
| | | ११ | प्रथमोचार | -- | २०,०००/- |
| | | १२ | किरकोळ अनुषंगिक खर्च | -- | ३०,०००/- |
| | | १३ | क्रीडांगण तयार करणे | -- | ५०,०००/- |
| | | | एकुण | | १५,००,०००/- |
| ५ | योजना राबविणारी यंत्रणा | जिल्हा क्रीडा अधिकारी नंदुरबार | | | |
| ६ | अंमलबजावणी अधिकारी | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा व जिल्हाधिकारी, नंदूरबार | | | |
| ७ | नियंत्रक अधिकारी | अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | | | |
| ८ | योजनेचा उद्देश | वनबंधु योजने अंतर्गत अक्राणी तालुक्यातील आदिवासी जमातीच्या प्रतिभावन खेळाडूंची निवड करून त्यांचे पारंपारीक खेळांचे अद्यावत तंत्रशुध्द क्रीडा प्रशिक्षण देवून त्यांना राज्य शासनाच्या क्रीडा प्रबोधिनीमध्ये प्रवेश देण्यासाठी सदरची योजना राबविण्यात येत आहे. आदिवासी विभागामार्फत दरवर्षी स्पर्धांचे आयोजन तालुका, जिल्हा व राज्यस्तरावर करण्यात येते. स्पर्धा संपल्यानंतर वर्षभर सराव होत नाही त्यामुळे आदिवासी खेळाडूंचा कौशल्य दिसून येत नाही. अशा खेळाडूंना शोधुन त्यांना जिल्हा क्रीडा प्रशिक्षणाची सोय २० दिवसाचे प्रशिक्षण शिबीराच्या माध्यमातूर राबविण्याचे मानस आहे. या योजनेच्या माध्यमातून अक्राणी तालुक्यातील आदिवासी जमातीच्या क्रीडापटूंच्या संख्येत निश्चितच वाढ होणार आहे. नवोदित क्रीडापटूंच्या संख्येत वाढ झाल्याने त्यांचे दर्जात देखील वाढ होणार आहे. त्यामुळे सदर क्रीडापटूंच्या वाढलेलया क्रीडा कौशल्यास योग्य व्यासपीठ उपलब्ध करून देवून त्यांचे कौशल्यास योग्य आकार दिल्यास राज्य राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवरील पदकविजेते खेळाडू जास्तीत जास्त संख्येने निर्माण होणे शक्य होणार आहे. या पार्श्वभूमीवर जिल्हा क्रीडा संकुलाचा उपलब्ध क्रीडा सुविधांचा पुरेपूर उपयोग आदिवासी जमातीच्या खेळाडूंना जास्तीत जास्त लाभ होईल या दृष्टीने जिल्हा क्रीडा संकुल, नंदुरबार येथे योजना आखण्यात आलेली आहे. | | | |

| | | |
|---|---|---|
| ९ | योजना अंमलबजावणीची कार्यपद्धती | तालुक्यातील आश्रमशाळांमध्ये विविध क्रीडा स्पर्धांचे आयोजन करून त्यामधून १०० गुणवंत खेळाडूंची निवड करून त्यांना तज्ञ मार्गदर्शकांमार्फत उत्तम प्रशिक्षण व चांगल्या सुविधा पुरविण्यात याव्यात. |
| १० | लाभार्थी निवडीची कार्यपद्धती | १०० खेळाडूंची निवड तज्ञ मार्गदर्शकांमार्फत करण्यात यावी. |
| ११ | योजनेच्या अटी व शर्ती | १. सदर योजनेच्या साध्या बाबतचा अहवाल व निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात अपर आयुक्त/ आयुक्त आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावे.<br>२. सदर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल योजना पुर्ण झाल्यानंतर छायाचित्रण, चलचित्रफीत, लाभार्थ्याचे मनोगत यासह सादर करावा.<br>३. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये क्षेत्रीय कार्यालयास काही अडचण निर्माण झाल्यास योजना अंमलबजावणीच्या कार्यपध्दतीत बदल करण्याचा अधिकार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांना राहील.<br>४. सदर योजने अंतर्गत लाभ दिलेल्या लाभार्थ्यांच्या यादया अपर आयुक्त, प्रकल्प अधिकारी यांचे कार्यालयातील सुचना फलकावर तसेच आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्याची कार्यवाही प्रकल्प अधिकारी/अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी. |
| १२ | योजनेचा कालावधी | १ वर्ष |
| १३ | योजनचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | १. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा हे आदिवासी निरीक्षकांमार्फत वेळोवेळी योजनेचे मुल्यमापन करतील<br>२. सदर योजनेचे त्रयस्थ पक्षा मार्फत मुल्यामापन करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, तळोदा यांची राहील. |